**राज्यातील भविष्यातील पाणी टंचाई निवारणार्थ पुढील नियोजनासाठी संभाव्य पाणी टंचाई कृती आरखडा तयार करणे**

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन शुध्दीपत्रक क्रमांकः टंचाई २०१४/प्र.क्र. १२३/पापु १४

गो. ते. रुग्णालय, ७ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ३ नोव्हेंबर, २०१४

**पहा -**

**१) शासन परिपत्रक समक्रमांकः दिनांक १.१०.२०१४**

राज्यात ग्रामीण/नागरी क्षेत्रात ज्या ठिकाणी यावर्षी सरासरीपेक्षा कमी पर्जन्यमान झालेले आहे, अशा क्षेत्रात येत्या उन्हाळ्यात पिण्याच्या पाण्याची टंचाई निमाग्ण होण्याची शक्यता लक्षात घेऊन, पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ करावयाच्या उपाययोजनांसंदर्भात करावयाच्या कार्यवाहीबाबत मार्गदर्शक सूचना उपरोल्लेखित शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यातील अ.क्र. १ येथे महाराष्ट्र भूजल (पिण्याच्या पाण्याच्या प्रयोजनासाठी विनियमन) अधिनियमातील तरतूदीनुसार कार्यवाहीबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. त्यामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**शुध्दीपत्रक -**

संदर्भाधीन दि. १ ऑक्टोबर, २०१४ च्या परिपत्रकातील परिच्छेद १ मधील सूचना क्र. १ खालीलप्रमाणे आहे.

“महारराष्ट्र भूजल (पिण्याच्या पाण्याच्या प्रयोजनासाठी विनियमन) अधिनियमातील कलम ३ नुसार घोषित केलेल्या सार्वजनिक पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोताच्या ठिकाणापासून ५००मीटरच्या अंतरात, पिण्याच्या पाण्याच्या प्रयोजनाव्यतिरिक्त, इतर प्रयोजनासाठी विहिर खोदण्यास परवानगी न देणे, कलम ५ नुसार पिण्याच्या पाण्याच्या उद्भवापासून १ कि. मी. च्या परिसरात असणाऱ्या स्त्रोताच्या उपशावर निर्बंध आणणे, कलम ७ नुसार जे अति उपशाचे पाणलोट क्षेत्र असेल त्या क्षेत्रात पिण्याच्या पाण्याच्या प्रयोजनाव्यतिरिक्त , इतर प्रयोजनासाठी , विहिर खोदण्यास परवानगी न देणे, कलम ८ नुसार अति उपशाच्या पाणलोट क्षेत्रातील सार्वजनिक पिण्याच्या पाण्याच्या उद्भवावर प्रतिकूल परिणाम करणाऱ्या विहिरीमध्ये पाण्याचा उपसा बंद करणे या तरतूदींचे तसेच ९ व १६ मधील तरतूदींचे काटेकारपणे पालन करावे व भूजल उपशावर नियंत्रण आणावे”

या सूचना क्र. १ मध्ये दुरुस्ती करण्यात येत आहे. सदर सूचना खालीलप्रमाणे वाचण्यात याव्यात.

"१) महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) अधिनियम, २००९ मधील कलम २० नुसार घोषित केलेल्या सार्वजनिक पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोतांच्या प्रभाव क्षेत्रात किंवा कलम २१ नुसार प्रभाव क्षेत्र अधिसूचित होईपावेतो स्त्रोताच्या ५०० मीटर अंतरामध्ये पिण्याच्या पाण्याच्या प्रयोजनाव्यतिरिक्त इतर प्रयोजनासाठी कोणत्याही विहिरींचे खोदकाम करण्याची परवानगी न देणे, त्याचप्रमाणे कलम २२ नुसार प्रभाव क्षेत्रातील विद्यमान विहिरीतील भूजल उपशामुळे कोणत्याही सार्वजनिक पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोतावर प्रतिकूल परिणाम होत असल्याचे आढळून येत असल्यास जिल्हा प्राधिकरण आदेशाद्वारे वाजवी कालावधी करिता अशा विहिरीमधून भजल उपसा करण्यास मनाई करणे, तसेच कलम २५ नुसार जिल्हा प्राधिकरण, पावसाचे प्रमाण व स्वरुप व पाणलोट क्षेत्रातील पाण्याच्या पातळीची माहिती किंवा अन्य कोणत्याही संबंधित बाबी लक्षात घेवून एका जल वर्षापेक्षा अधिक नसलेल्या कालावधीकरिता पाणी टंचाई क्षेत्र घोषित करणे, कलम २६ नुसार पाणी टंचाई क्षेत्र घोषित केल्यावर सार्वजनिक पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोतापासून १ कि. मी. अंतरावरील विहिरीद्वारे भूजल उपशावर तात्पुरती बंदी आणण्याची कार्यवाही जिल्हा प्राधिकरणामार्फत करण्यात यावी.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०३११४२५१८७५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Reason: I am the author of this document
Date: 2014.11.03 16:00:26 +05'30'

(म. भ. सावंत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
२. सर्व विभागीय आयुक्त
३. सर्व जिल्हाधिकारी
४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
५. सर्व मुख्याधिकारी, नगर परिषद
६. सर्व वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
७. सर्व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद
८. सर्व विभागीय उप संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
९. सर्व विभागीय मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
१०. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
११. प्रधान सचिव (पापुवस्ववि) यांचे स्वीय सहायक
१२. निवड नस्ती